राष्ट्रपिता महात्मा गांधी यांची १५० व्या जयंती साजरी करण्याकरीता राबविण्यात येणाऱ्या विविधि कार्यक्रमांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१९ /प्र.क्र.४६ /पंरा-१

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: २६ फेब्रुवारी, २०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८ / प्र.क्र.८५ /पंरा-१ दिनांक १६ एप्रिल, २०१८.
२) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८ / प्र.क्र.८४ /पंरा-१ दिनांक २४ सप्टेंबर, २०१८.
३) मा. मंत्री ( वित्त आणि नियोजन व वने ) तथा अध्यक्ष राज्यस्तरीय समिती यांच्या अध्यक्षेतेखाली दि.२०/८/२०१९ रोजी झालेली बैठक

**प्रस्तावना :-**

राष्ट्रपिता महात्मा गांधीजीं यानी दिलेली शिकवण, आचरणात आणलेली मुल्ये संदेश जगभरातील पुढील पिढ्यांपर्यंत जिवंत ठेवण्याकरीता महात्मा गांधीजी यांच्या १५० व्या जयंती निमित्त दि. २ ऑक्टोंबर,२०१८ ते दि. २ ऑक्टोंबर,२०२० या दोन वर्षाच्या कालावधीत राज्य शासनामार्फत विविध कार्यक्रमांचे आयोजन केले जाणार आहे. याकरीता आवश्यक असणाऱ्या खर्चाकरीता ग्रामविकास विभागाने खालील प्रमाणे नवीन लेखशिर्ष उघडले असून त्यामध्ये माहे, जून २०१९ च्या पावसाळी अधिवेशनात पुरक मागणीव्दारे रु. १५० कोटीची तरतूद मंजूर करण्यात आली आहे.

पुरक मागणी क्र . एल -३,
२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण
६०, सामाजिक सुरक्षा व सामाजिक कल्याण कार्यक्रम
८००, इतर कार्यक्रम,
( ०० ) ( ०१ ) राष्ट्रपिता महात्मा गांधीजी यांचा १५० व्या जयंती स्मरणोत्सव साजरा करणे- राष्ट्रपित्याला आदरांजली म्हणून अभियानांतर्गत विविध उपक्रमांचे आयोजन करणे ( कार्यक्रम )
२०-इतर प्रशासकीय खर्च-३० कोटी
२६- जाहिराती व प्रसिध्दी- २० कोटी
३१- ( सहायक अनुदाने ) ( वेतनेतर )-१०० कोटी

---

**एकूण १५० कोटी**

## शासन निर्णय:-

मा. मंत्री ( वित्त आणि नियोजन व वने ) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २०/८/२०१९ रोजी झालेल्या बैठकीत राष्ट्रपिता महात्मा गांधीजीं यांच्या १५० व्या जयंती निमित्त विविध विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमांचे सादरीकरण करण्यात आले. सदर बैठकीत खालील प्रस्तावांस मान्यता दिलेली आहे -

| अ.क्र | विभागाचे नाव/ संस्थेचे नाव | कार्यक्रम | रुपये ( कोटीत ) | खर्चाचे उपशिर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | मणिभवन गांधी संग्रहालय | गांधी संग्रहालयाच्या देखभालीसाठी | ५.०० | २०-इतर प्रशासकीय खर्च |
| २ | महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ | ❖ स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या हद्दीमधून निर्माण होणारे घरगुती सांडपाणी व घनकचरा यामुळे होणाऱ्या नद्यांच्या पाण्याचे प्रदुषण नियंत्रण<br>❖ सॉलीड वेस्ट मॅनेजमेंट व सेफ्टी टॅक क्लिनिग प्रोजेक्ट | ७.००<br>०.३५ | २०-इतर प्रशासकीय खर्च<br>२०-इतर प्रशासकीय खर्च |
| ३ | पर्यटन व सांस्कृतिक कार्यविभाग | ❖ राष्ट्रपिता महात्मा गांधीजीं यांचे संकलित वाडमय मराठीमध्ये ई-बुक स्वरूपात प्रकाशित करणे<br>❖ श्रीमद राजचंद्र मिशन,धर्मापूर (SRMD ) मार्फत महात्मा गांधीजीं यांच्या १५० व्या जंयती निमित्त राज्यभरात भारत भाग्य विधाता या कार्यक्रमांचे २० नाट्यप्रयोग सादर करणे | १.०७<br>०.९० | २६-जाहिराती व प्रसिध्दी<br>२६-जाहिराती व प्रसिध्दी |
| | **एकूण** | | **१४.३२** | |

वर नमूद केलेल्या प्रस्तावांस पुरक मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या रु. १५० कोटीच्या अनुदानातून रू. १४.३२ कोटी इतक्या अनुदानाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२६१०३९१३३७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sharad Yadav

Digitally signed by Sharad Yadav
DN: cn=Sharad Yadav, o=Rural Development Department, ou=Section Officer, email=sharad.yadav64@nic.in, c=IN
Date: 2020.02.26 12:38:29 +05'30'

(शरद यादव)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेता-१),महाराष्ट्र ,मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेता-१),महाराष्ट्र ,नागपूर
३. सचिव,पर्यावरण विभाग,मंत्रालय,मुंबई
४. सचिव, पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय,मुंबई
५. सदस्य सचिव,महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ,मुंबई
६. जिल्हाधिकारी,वर्धा
७. जनसंपर्क अधिकारी, श्रीमद राजचंद्र मिशन,धर्मापूर
८. कार्यकारी सचिव,मणिभवन ,मुंबई-१
९. निवड नस्ती/पंरा-१